**सन २०२३-२४ करीता चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली येथे बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे (४४१५ ०१९२) निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.९०/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २० जुलै, २०२३

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२.४.२०२३
२. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१२/४८/२०२३-२४, दिनांक २४.४.२०२३
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.९०/फ-९, दि. २२.५.२०२३
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.९०/फ-९, दि. १६.६.२०२३
५. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१२/११४/२०२३-२४, दिनांक १७.०५.२०२३
६. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१२/१७२/२०२३-२४, दिनांक ०६.०६.२०२३

**प्रस्तावना :-**

सन २०२३-२४ करिता चिचपल्ली (ता.जि.चंद्रपूर) येथे बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे (४४१५-०१९२) या लेखाशिर्षाअंतर्गत रु.२५००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत आहे. संदर्भ क्र.३ व ४ च्या शासन निर्णयान्वये ०१-वेतन अंतर्गत रु.९.८४ लक्ष व ५३-मोठी बांधकामे अंतर्गत रु.६५.०७ लक्ष असे एकूण रु.७४.९१ लक्ष अनुदान वितरीत केले आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ चे परिपत्रकान्वये वित्तीय वर्ष सन २०२३-२४ करिता प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०२३ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्याच्या अनुषंगाने सूचना देण्यात आलेल्या आहेत.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.२, ५ व ६ च्या पत्रान्वये वेतन व इतर बाबींवरील खर्च भागविण्यासाठी रु.२६.८२ लक्ष, रु.६५०.७९ लक्ष व रु.१०९०.७४ लक्ष असे एकूण रु.१७६८.३५ लक्षचा चालू बाब प्रस्ताव प्राप्त झाला असून अनुदान उपलब्ध करुन देण्यास विनंती केली आहे. त्यानुसार या कामासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून संदर्भ क्र.२, ५ व ६ नुसार प्राप्त प्रस्ताव व वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ चे परिपत्रक विचारात घेता, चिचपल्ली (ता.जि.चंद्रपूर) येथे बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे (४४१५-०१९२) या योजनेमधून सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता संचालक, बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली स्थित चंद्रपूर येथील कर्मचाऱ्यांचा वेतन व इतर बाबींवरील खर्च भागविण्याकरीता खालील तक्त्यात दर्शविण्यात आल्यानुसार

रु.६१३.९१ लक्ष इतका निधी खालील अटी व शर्तीचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

(४४१५-०१९२)

| सविस्तर शिर्ष | रक्कम (रुपये लाखात) |
|---|---|
| ०१-वेतन | २३.६२ |
| ०२-मजुरी | ९.७८ |
| ११-देशांतर्गत प्रवास खर्च | ०.५५ |
| १३-कार्यालयीन खर्च | १०.४४ |
| २१-साहित्य व पुरवठा | २.७९ |
| ५०-इतर खर्च | ४९६.०८ |
| ५२-यंत्रसामग्री व साधन सामग्री | ५.५७ |
| ५३-मोठी बांधकामे<br>चिचपल्ली येथे बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्राच्या प्रशासकीय इमारत (शैक्षणिक इमारतीमध्ये बदल करुन बांधकाम करणे) बांधकाम करणे | ६५.०८ |
| **एकूण :-** | ६१३.९१ |

**अटी व शर्ती:-**

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.
२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.
३. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.
४. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.
५. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करावे.
६. सदर आर्थिक वर्ष २०२३-२४ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.
७. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.
८. संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांनी उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

९. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.
१०. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ रोजीच्या परिपत्रकातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.
११. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र.१७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक सी-१०, प्रधान शिर्ष ४४१५, कृषी विषयक संशोधन व शिक्षण यावरील भांडवली खर्च, ०६ वनीकरण, पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना, राज्य योजना अंतर्गत योजना, (००४) संशोधन (००) (०२) बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र चिचपल्ली (४४१५ ०१९२) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १२.४.२०२३ चे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७२११५३२५१४११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK VIJAY HOSHING

Digitally signed by VIVEK VIJAY HOSHING
DN: c=IN, o=Personal, title=4179, pseudonym=133142602957487084g5f8e27R5OJA8P, 2.5.4.20=d2eb76cc3763a845a8edf9b9dde07f42d90c6bc17db755d4af91632f6c0b678e, postalCode=414001, st=MAHARASHTRA, serialNumber=3b1afe499c80878329fbb017e4922f7356cc5edc76102e8ff88c7b9a67a322d9, cn=VIVEK VIJAY HOSHING
Date: 2023.07.21 15:33:38 +05'30'

**( विवेक होशिंग )**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), चंद्रपूर.
५. संचालक, बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली, चंद्रपूर
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. सह सचिव/उपसचिव,वित्त विभाग (अर्थ-३)/(व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
८. उप सचिव, नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
९. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)